ई - साहित्य प्रकाशन

वर्ष : दूसरे, अंक : ६
दिनांक : २५.०१.२०१०

# नेटाक्षरी



## CELEBRATING rePUBLIC DAY

**संपादक -**
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

**सहसंपादक -**
सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
सचिन काकडे ( मुंबई )

**या अंकात वाचा....नव्हे ऐका**

## प्रजेचा आवाज

६१ व्या प्रजासत्ताक दिनानिमित्त

प्रजेचा आवाज

असलेल्या खणखणीत कविता

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

# प्रजेचा आवाज

*Mankind will never see an end of trouble until... lovers of wisdom come to hold political power, or the holders of power... become lovers of wisdom.*

*....किंचितराव....*

भलते आणि सलते यांचे
जुळून येई नाते अवचित
जन्मा येते बालक गोंडस
नाव बिचाऱ्याचे रे किंचित
किंचित भलते शाळेमध्ये
खोड्या करतो असा अखंडित
वात्रट मित्रांसोबत कार्टे
धत्तिंग धिंगाणाच सदोदित
मास्तरांस लावतो शेपटी
मास्तरणींना मिशा काढतो
खाजकुयली पंख्यांवरती
तासाआधी भरुन ठेवतो
च्युंईंगमाचे चिकट बाकडे
डांबर लावी खुर्चीवरती
प्रिंसीपॉलच्या सफारीतूनी
सरसर झुरळे वरती येती
किती किंचितच्या कर्मांची
सलते भलते यांना कळते
हात मारती कपाळावरी
कोण पाप हे असे न कळते
मोठा होतो किंचित राव
दराऱ्यापुढे झुकतो गाव
नगरसेवकाच्या खुर्चीवर
खातो मलिदा खातो भाव
होता होता मंत्री होतो
भलती सलती मते मिळवूनी
पक्ष काढतो पुढे स्वतःचा
युती आघाडी मान झुकवूनी
किंचित भलते येतो जातो
सारे रस्ते सलाम करती
वर्गामधले पहिले नंबर
वशिल्यासाठी रांग लावती
वाहतात जी बाळे ओझे
जन्मच त्यांचा त्यातच जातो
अलते भलते किंचित हलती
मिजास त्यांची आम्ही राखतो

*- नाम गुम जायेगा,ठाणे*

## ....माणूस आणि गाढव....

एकदा मला प्रश्न पडला,माणूस आणि गाढव यात श्रेष्ठ कोण ?
काही कळेना,विचार करुनही उत्तर मिळेना
मग मी एक शक्कल लढवली,नामी नेत्यांची मैफल जमवली

लालवानी म्हणाले,माणूस गाढव भाऊ भाऊ
सांग याचं खरं उत्तर कसं देऊ ?

घेवार म्हणाले,मी काय बोलणार ?
काँग्रेस गवताने नुसते रान माजणार

दयावती बोलल्या मी भावी पंतप्रधान
खऱ्या उत्तराने जाईल माझी शान

मग मी बिहार कडे गेलो
भालूप्रसादांना उत्तर विचारु लागलो
त्यांनी प्रथम पानाची पिंक टाकली
माझ्या शर्टावर लाल रांगोळी घातली
म्हणाले,तुला हा प्रश्न का पडावा ?
राजकारण करुनही तू कोरडाच कसा रे गाढवा ?
माणसाला पाय दोन,गाढवाला चार,
कोण श्रेष्ठ याचा कर जरा विचार!!

भयसरिता म्हणाल्या,अगदी सोप्पे आहे
दोघांपैकी कोणीतरी श्रेष्ठ आहे

शेवटी मी पश्चिमेकडे गेलो,त्यांच्यापुढे वाकलो
ते म्हणाले,ऐक उत्तर,देऊन नीट ध्यान
आमचा मान राखला तर गाढ़वाचीही वाढेल शान

अखेर चर्चा मुद्यावरुन गुद्यावर आली
सर्वांची आपसांत लाथाळी सुरु झाली
बैठकीला रणभूमीचे स्वरुप आले
लंबकर्णही आपल्या जातभाईंना वाकून वाकून पाहू लागले

- साधना गोखले,पुणे

*Politics is war without bloodshed, while war is politics with bloodshed.*

*Instead of giving a politician the keys to the city, it might be better to change the locks*

## ....कारणामागचे राजकारण....

बिनबुडाच्या कारणावरुन
दिल्लीत नेहमीचेच राजकारण
प्रश्न सोडवण्याऐवजी वाढवण्याचे
शोधताय सगळेच तिथे कारण

स्वतःचे खिसे भरतांना
शत्रूंचे मित्र होण्याचे राजकारण
रोजचीच सोंगं बदलतांना मात्र
लोकहितासाठी एकत्र आल्याचे कारण

परदेश दौऱ्यासाठी
मंत्र्यामंत्र्यांमधेच राजकारण
मजेत सुट्टी घालवतांना
मात्र परदेशी अभ्यासाचे कारण

दुसऱ्याच्या नाकी वेसण घालतांना
नेहमीच दडपशाहीचे राजकारण
चौकातल्या गुंडांसारखे भांडतांना
मात्र सामान्यांच्या प्रश्नांचे कारण

भावाला भावाशी लढवून
मतांसाठीचे ते नेहमीच राजकारण
हजारोंची घरे फुंकून
मात्र धर्मावरच्या अन्यायाचे कारण

प्रत्येक निवडणूकीत लोकांच्या
त्याच त्याच प्रश्नांवर राजकारण
बहुमताने निवडून येऊनही मात्र
पक्षश्रेष्ठींना ते मान्य नसल्याचे कारण

लाख़ो लोकांच्या ह्या प्रतिनिधींचे
हजार हजार रुपयांसाठी राजकारण
लोकांचाच पैसा असा पळवतांना
मात्र पक्ष उभारणीचे कारण

कारणांमागचे हे राजकारण
लोकांच्या नेहमीच डोक्यावरुन गेले
सामान्यांच्या ह्याच भाबडेपणावर त्यांनी
नेहमीच कारणाचे राजकारण केले

*- नितीन पिठोडे,पुणे*

....राजकारणी....

वेदना भूमिपुत्राची,वंचना अशिक्षिताची
गर्दी जीवघेणी,अपघातांचे बळी
सारी दुःख मला वाटायची माझी
नव्हतो मी तेव्हा राजकारणी कुणी

दुःखी जनांनी,बेघर मुलांनी
गरीब बायांनी,हीन दीनांनी
दिली प्रेरणा या साऱ्यांनी
सेवा तयांची करण्याची

करता सेवा समाजाची
स्वप्न वैभवाचे आले मनी
चला जमवूया झटपट माया
याचि देही याचि डोळा

कोण जाणे काय केली
मायेने या किमया ?
होतो गरीब तरी डोळस मी
झालो पुरता आंधळा

कष्टून राबून खाण्याचे
दिवस आता गेले हो
चार पावले चालतांनाही
पाय माझे थकले हो

फिरतो घेऊन आलिशान गाडी
घरीदारी नोकर मंडळी
ऐश्वर्य आता लोळते घरी
फिकीर कशा मग मज कोणाची ?

भ्रष्टाचार अन वशिलेबाजी
झटपट सारे कामे करती
राहिलो न आता माणूस मी
मलाच झालो परका मी

विसर पडला आहे मजला
बांधवांच्या उत्कर्षाचा
विचार नाही शिवत मनाला
समाजाच्या सेवेचा

वाटत नाही सुटतील आता
प्रश्न हे राष्ट्रामधले
सुटला मात्र प्रश्न माझा
अन्य कर्तव्यचि न उरले

- मंजिरी ढेरे,पुणे

*We have plenty of Confidence in this country, but we are a little short of good men to place our Confidence in.*

*Politicians are the same all over. They promise to build a bridge where there is no river.*

## ....आभाळातले राजकारण....

हवेचे राजकारण पाहणारे तीन वायू
आपली सत्ता जाणार म्हणून रडत होते
इकडे पृथ्वीवरच्या अक्कलदाढांनी मात्र
शेपट्या हलवायला केव्हाच सुरुवात केली होती
काहींनी आधुनिकतेचे धूर सोडले तर
बाकीच्यांनी उरलेले गळ टाकून
मासेमारीही रासायनिक केली
निसर्गाला कृत्रिम बनवल्यावर
प्रदूषणाची त्सुनामी आली
तशी इकडे मुख्य शासनापेक्षा इतर वायुंची
मंत्रिमंडळात घुसखोरी वाढू लागली
हरित वायू,इतर विषारी वायू यांसारखे
व अन्य बंडखोर सभागृहाचे सदस्य होऊ लागले
तापमानाच्या पक्षातल्या सदस्यांनी
राजीनामे देऊन पाताळ गाठले होते
हवामानाच्या पक्षात येऊन यांनी
सगळया जागा जिंकल्या होत्या
ऋतुंच्या विरोधी पक्षाच्या अब्रूचे धिंडवडे काढले होते
यामुळे ऋतुंमध्ये दंगल चालू होती
ओझोन व वातावरणाच्या इतर कक्षामध्ये
गडबड घोटाळयाचे प्रकरण करुन
परदेश दौरा हानीकारक करण्याची
तिमीरांना लाच यांनीच दिली गेली
कार्बन,हायड्रोजन सारखे बडे नेते
ऑक्साइडस खाल्ल्याने भ्रष्टाचारी झाले
याला नवजात प्राणवायू,गंधक व त्यांचे
छोटे भाऊ या डाव्यांचा पूर्ण पाठींबा होता
निराळे विकार,आम्ल पर्जन्य यासारख्या
योजना त्यांच्या विकासासाठी आखल्या होत्या
निवडणूका जवळ आल्याने सगळी
प्रचाराची तयारी जोरात चालू होती
वृक्षांचा गळा आवळल्याने प्राणवायूचा
मोठ्या फरकाने पराभव निश्चित होता
अतिदुर्गम तसेच निसर्गाचे वरदान
लाभलेल्या भागात शिरकाव करुन
प्रचार करुन बंडखोरांचाही विजय
अगदी पक्का होता आणि तसेच झाले
आघाडी सरकारपुढे सगळयांनीच
काही घटकेनंतर नमते घेतले
प्राणवायूसह इतर अपक्ष उमेदवारांना
मानहानीकारक हार पत्करावी लागली
प्रशासनाच्या दूषितीकरणाला सर्वस्वी
डोके गहाण टाकलेले पृथ्वीवरचे
जबाबदार चालक मालक,यंत्री घोडे
त्यांचे साथीदारच कारणीभूत आहेत

- पराग रिसबूड,नवी मुंबई

*....त्यांना माझा भूभू हवा होता....*

परवा कसं कोण जाणे माझ्याही घरी
पोस्टाने एक नोटांचं बंडल आलं
बंडल नाही मारत,खरं सांगतोय
त्यावर माझ्या भुभुचं नाव लिहीलेलं

सरकार चालवायला सर्वपक्षीय आघाडीला
माझा भुभु हवा होता
खाल्ल्या पैशांना जागणारा
किमान एक नेता हवा होता

डावे करताच तात्विक वळवळ
कडाडून चावणारा देशभक्त हवा होता
त्यांच्या भोंदूगिरीवर जाहीर मुतणारा
ताठ कण्याचा मर्द हवा होता

उजवे ओकताच धार्मिक गरळ
निस्तरायला त्यांना राम हवा होता
समाजवादी घालताच समाजात गोंधळ
सुदर्शन उगारणारा शाम हवा होता

पत्रकार म्हणविणारी गिधाडे फाडणारा
निधड्या छातीचा शेर हवा होता
न्यायासनाखाली दडलेले नाग ठेचणारा
मर्दाच्या जातीचा जवान हवा होता

मी म्हटलं,मी माझा भुभु देणार नाही
कुत्रा असला म्हणून काय झालं ? त्याला 'नेता' करणार नाही
गरीब बिच्चाऱ्या भुभुचा असला अपमान करणार नाही
निदान त्याची तरी शेपूट मी तुमच्यासमोर हलू देणार नाही

*- सॅम ( मन्नु ),मुंबई*

*We live in a world in which politics has replaced philosophy.*

*We'd all like to vote for the best man, but he's never a candidate.*

*....कैफियत....*

मी मत देणार,नक्कीच देणार
कुणाला माहीत नाही,का माहीत नाही
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
भ्रष्टाचार रोज पाहते मी
तत्वांचा,मुल्यांचा,शिष्टाचाराचा बलात्कार होतांना रोज बघते मी
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
सकाळी निघतांना संध्याकाळी सुखरुप
घरी परत येईन की नाही माहित नसते
मीच शिकार आणि मीच माझी संरक्षक
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
राजकारण बहुधा Family Business झालाय
देशाचे हित चिंतणारा आक्रमक हुशार सर्वसामान्य तरुण
आपल्या देशात नाहीये असंच वाटतंय
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
ऑफिसमध्ये Deadlines, Targets achieve करायचे आहेत
Recession मुळे जॉबचंही काही खरं नाहीये
इथे देशाचा विचार करायला वेळ कुणाकडे आहे
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
Criminal Record नसलेला राजकारणी ह्या देशात विरळाच
गुन्हेगारांचा Make-over झालाय की राज्यकर्त्यांचा
तेच कळत नाहीये
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
लोकशाही म्हणे लोकांनी लोकांसाठी चालवलेले राज्य
पण आता लोकशाहीची व्याख्याच बदलत चाललीये
rather बदलली आहे
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
माझं महत्व फक्त एका मतापुरतंच
नंतर मी आहेच की सदैव Available, Free of cost
किड्या मकोड्यांसारखा
कधीही,कुठेही,कुणीही येऊन माझा खून करायला
बेरोजगारी,गरिबी,महागाई,भ्रष्टाचार मला मारतेच आहे
आणि राहिलो वाचलोच तर आतंकवाद आहेच की
तोंड उघडून बसलेला मला गिळायला
इतकं लाचार केलंय मी स्वतःलाच
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
पण खरंच मी मत का देणार ?
कुणाला देणार ? कशाला देणार ?
ह्याची उत्तरं मिळतीलंच ह्याची खात्री नाही
आणि मिळालीच तर ती समाधानकारक असतीलच ह्याचा भरवसा नाही
तरीही मी मत देणार,नक्कीच देणार
कुणाला माहीत नाही,का माहीत नाही
आणि एक 'सुट्टी' मस्तं Enjoy करणार

*- भारती सरमळकर,मुंबई*

# नेटाक्षरीतर्फे सर्व भारतीयांना ६१ व्या प्रजासत्ताक दिनाच्या हार्दिक शुभेच्छा

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.

हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..* netaksharee@gmail.com